**मुख्यमंत्री सौर कृषी वाहिनी योजना २.० अंतर्गत वनेत्तर क्षेत्रावरील वृक्षतोड परवानगी व वाहतूक परवाना देण्याच्या संदर्भात मानक कार्यप्रणाली (SOP) बाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसुल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:- टिआरएस-२०२५/प्र.क्र.२२/फ-६,**
चौथा मजला, विस्तार इमारत, हुतात्मा राजगुरु चौक,
मादाम कामा मार्ग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक:- २९ एप्रिल, २०२५.

**वाचा:-**

१) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र. सौरप्र-२०२३/प्र.क्र.९५/ऊर्जा-७,दि.०८.०५.२०२३.
२) शासन परिपत्रक क्र. DIPP/TFTP/CR NO. 21/F-6, दि.२७.०४.२०१७.
३) मा. मुख्यमंत्री यांच्या अध्यक्षतेखाली दि. ३१.१२.२०२४ रोजी मुख्यमंत्री सौर कृषी वाहिनी योजना २.० बाबत बैठकीत मा. मुख्यमंत्री यांनी दिलेले निर्देश.

**प्रस्तावना:-**

शेतकऱ्यांच्या शेतीपंपाना दिवसा वीज पुरवठा करण्यासाठी कृषी फिडर्सचे सौर ऊर्जीकरण मिशन मोडमध्ये करण्याच्या दृष्टीने “मुख्यमंत्री सौर कृषी वाहिनी योजना-२.० शेतकऱ्यांच्या शेतीपंपाना दिवसा अखंडीत व शाश्वत वीज पुरवठा करण्याचे अभियान” या योजनेबाबत संदर्भाधिन दि. ०८.०५.२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. सदर अभियानांतर्गत मुख्यमंत्री सौर कृषी वाहिनी योजना अधिक सक्षम आणि सुव्यवस्थित करणे, राज्यात सन २०२५ पर्यंत किमान ३० टक्के कृषी वीज वाहिनीचे सौर ऊर्जीकरण करण्यासाठी तांत्रिक, आर्थिक कार्यपद्धती आणि देखरेखीचा आवश्यक आराखडा तयार करणे तसेच शेतकऱ्यांना दिवसा अखंडीत व शाश्वत वीज पुरवठा करता यावा यासाठी किमान ७००० मेगावॅट सौर ऊर्जा क्षमता निर्माण करणे इ. उद्दिष्ट्ये नमूद करण्यात आली आहेत.

०२. मुख्यमंत्री सौर कृषी वाहिनी योजना-२.० ही शासनाची फ्लॅगशीप योजना असल्याने योजनेंतर्गत प्रकल्पांची कार्यक्षमता, प्रभावी व कालबद्ध अंमलबजावणीकरीता उपाययोजना तात्काळ करणे आवश्यक आहे. सबब, मुख्यमंत्री सौर कृषी वाहिनी योजना-२.० अंतर्गत वनेत्तर क्षेत्रावरील वृक्षतोडीच्या परवानगीच्या अनुषंगाने मानक कार्यप्रणाली (SOP) निर्गमित करण्याची बाब शासनाची विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

१. मुख्यमंत्री सौर कृषी वाहिनी योजना-२.० अंतर्गत वनेत्तर क्षेत्रावरील वृक्षतोड परवानगी व वाहतूक परवाना देण्याच्या संदर्भात मानक कार्यप्रणालीस (SOP) सोबतच्या विवरणपत्रात नमूद केल्याप्रमाणे शासन मान्यता प्रदान करण्यात येत आहे.
२. मुख्यमंत्री सौर कृषी वाहिनी योजनेअंतर्गत सरकारी/निमसरकारी/सार्वजनिक उपक्रमांच्या प्रकल्पांना सरकारी जमिनींवरील झाडांच्या मूल्यांकनाच्या अटीपासून सूट देण्यात येत आहे.
३. झाडांची तोडणी आणि वाहतूक याबाबतचा खर्च वापरकर्ता यंत्रणा करेल.

४. वनेत्तर क्षेत्रावरील वृक्षतोडीची परवानगी सक्षम अधिकारी (वन परिक्षेत्र अधिकारी) यांनी १५ दिवसांच्या आत द्यावी.

५. वन विभागातील सक्षम प्राधिकारी वापरकर्ता यंत्रणेने अर्ज केल्यापासून ७ दिवसांच्या आत वाहतुक परवाना जारी करेल.

६. शासनामार्फत वेळोवेळी निर्गमित करण्यात आलेले अधिनियम, नियम आणि आदेशांचे वापरकर्ता यंत्रणेने उल्लंघन करू नये.

७. वन विभाग वापरकर्ता यंत्रणेला वृक्षतोड आणि वाहतूक परवाने विहित वेळेत मिळण्याकरीता आवश्यक मदत करेल.

८. सामाजिक वनीकरण विभागाला इतर यंत्रणांनी वनीकरणासाठी हस्तांतरीत केलेले वृक्षारोपण क्षेत्र जर (Plantation by Social Forestry Department) मुख्यमंत्री सौर कृषी वाहिनी योजना २.० अंतर्गत प्रकल्पांसाठी प्रस्तावित केले असेल व त्यावर वनीकरणाचे काम पूर्ण होऊन यंत्रणेला हस्तांतरीत केले असेल तर सामाजिक वनीकरण विभागाचे ना हरकत प्रमाणपत्र (एनओसी) घेण्याची आवश्यकता राहणार नाही. तथापि, चालू रोपवनक्षेत्राकरिता सामाजिक वनीकरण विभागाचे ना-हरकत प्रमाणपत्र घेणे आवश्यक राहिल.

०२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा सांकेतांक क्रमांक २०२५०४२९१६०६४५३३१९ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SHILPA VINAY PATWARDHAN

Digitally signed by SHILPA VINAY PATWARDHAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=505eeafe3f9e7d70f63a44a99a167a7b82f5f960e6935504b09176ad120d080e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=2E5A83C1841FAABC41727E7EBE9ACE8CE284A9564CBC908352616154B5CA4B5D, cn=SHILPA VINAY PATWARDHAN
Date: 2025.04.29 16:08:17 +05'30'

**( शिल्पा पटवर्धन )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१.मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव,मंत्रालय, मुंबई
२.मा.मंत्री (वने) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३.अपर मुख्य सचिव (वने) यांचे स्वीय सहायक, महसुल व वनविभाग, मंत्रालय, मुंबई
४. प्रधान मुख्य वनसंरक्षक ( वन बल प्रमुख ) महाराष्ट्र राज्य, नागपूर
५.अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (सर्व)
६.सर्व विभागीय आयुक्त
७.सर्व जिल्हाधिकारी
८.मुख्य वनसंरक्षक (सर्व)/वनसंरक्षक (सर्व)/उपवनसंरक्षक (सर्व)
९.निवडनस्ती, फ-६ कार्यासन, महसुल व वनविभाग, मंत्रालय, मुंबई-३२

**सहपत्र**

**मुख्यमंत्री सौर कृषी वाहिनी योजना-२.० अंतर्गत वनेत्तर क्षेत्रावरील वृक्षतोड परवानगी व वाहतूक परवाना देण्याच्या संदर्भात मानक कार्यप्रणाली (SOP)**

| अ.क्र. | विषय | दिवस |
|---|---|---|
| १ | वापरकर्ता यंत्रणेमार्फत शासन परिपत्रक दिनांक २७/०४/२०१७ मध्ये नमूद विहित नमुन्यात वृक्षतोडीचा प्रस्ताव सादर करण्यात यावा. | -- |
| २ | वन विभागामार्फत अर्जाची छाननी व कागदपत्रांची तपासणी करण्यात येईल आणि अतिरिक्त कागदपत्रे (आवश्यकता असल्यास) सादर करण्यासाठी वापरकर्ता यंत्रणेला कळविण्यात येईल. | ३ दिवस |
| ३ | आवश्यकतेनुसार, संयुक्त मोजणी आणि क्षेत्र पडताळणी करण्यात यावी. वृक्षतोड परवानगीकरीता प्रकल्प क्षेत्राची सीमा तसेच वृक्षांची व्याप्ती निश्चित करण्याची जबाबदारी वापरकर्ता यंत्रणेची असेल. | ५ दिवस |
| ४ | वन परिक्षेत्र अधिकारी यांनी महाराष्ट्र वृक्षतोड (नियमन) अधिनियम, १९६४ / महाराष्ट्र जमीन महसूल (झाडे इत्यादीच्या बाबतीतील अधिकारांचे नियमन करण्याबाबत) नियम,१९६७ मधील अधिकारांचा वापर करून वृक्षतोडीची परवानगी दयावी. | ७ दिवस |
| ५ | वन विभागातील सक्षम अधिकारी वापरकर्ता यंत्रणेद्वारे अर्ज केल्यापासून ७ दिवसांच्या आत वाहतुक परवाना जारी करतील. | ७ दिवस |

*****